इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांची दि.०१.०१.२०२५ रोजीची सेवाज्येष्ठता यादी.

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सेवाज्ये-२०२५/प्र.क्र. ५६ /आस्थापना-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: २३ एप्रिल, २०२५

**वाचा :**
१. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक- आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.०८/आस्थापना-२ दि. १४.०१.२०२१ व दि.२२.०३.२०२२

२. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-२०२३/प्र.क्र.१४४/आस्था-२ दि. ३१.१०.२०२३

३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचे दि. ०२.०१.२०२५ रोजीचे पत्र

**शासन निर्णयः-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयासाठी संदर्भ क्र.०१ अन्वये सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. मंजूर सुधारित आकृतीबंधानुसार संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांच्या आस्थापनेवरील इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब) या संवर्गातील अधिकाऱ्यांची पदे संदर्भाधीन क्र. ०२ अन्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाकडुन या विभागाकडे कायमस्वरुपी पदे वर्ग करण्यात आली आहेत. त्यास अनुसरुन सद्यस्थितीत इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी गट-ब संवर्गात दि. ३१.१२.२०२४ रोजी कार्यरत अधिकाऱ्यांची दि. ०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द करण्याबाबत संदर्भाधीन क्र.०३ अन्वये संचालक, इतर मागास बहजुन कल्याण संचालनालय, पुणे यांनी विनंती केली आहे.

२. त्यानुषंगाने दि. ३१.१२.२०२३ रोजी पर्यंत सेवानिवृत्त, स्वेच्छासेवानिवृत्त, नियमित/तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नत, मयत झालेले अधिकारी वगळून दि.०१.०१.२०२५ रोजीची तात्पुरती सेवाज्येष्ठता यादी सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये प्रसिध्द करण्यात येत आहे. ही सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द करताना दि.१ जानेवारी हा आधारभूत दिनांक मानण्यात आलेला आहे.

३. सदर सेवाज्येष्ठता यादीबाबत संबंधित अधिकाऱ्यांचे काही आक्षेप/हरकती असल्यास त्याबाबत त्यांच्या हरकतीची निवेदने दोन प्रतीत योग्य त्या कागदपत्रांसह संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांचेकडे ही ज्येष्ठतासूची प्रसिध्द झाल्यापासून १५ दिवसांच्या आत पाठवावीत. त्यानंतर प्राप्त निवेदन / आक्षेपाचा विचार करण्यात येणार नाही.

४. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे यांनी यासंदर्भात त्यांना प्राप्त झालेली सर्व निवेदने एकत्रित करुन तद्नंतर त्यावरील स्वयंस्पष्ट अभिप्रायासह शासनाकडे प्रस्ताव पाठवावा, म्हणजे त्यांची पडताळणी करुन आवश्यक दुरुस्तीसह अंतिम सेवाज्येष्ठता यादी प्रसिध्द करणे शक्य होईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२३१५१६५२३३३४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.04.23 15:17:48 +05'30'

**(कैलास साळुंके)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,** १. मा. मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३.संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. संबंधित सर्व अधिकारी (संचालक,इ.मा.ब.क यांचे मार्फत)
५.निवड नस्ती (आस्थापना-२)

शासन निर्णय क्र.सेवाज्ये-२०२५/प्र.क्र.५६ /आस्थापना-२ , दिनांक २३ एप्रिल, २०२५ सोबतचे प्रपत्र

१. संवर्गाचे नावः- इतर मागास बहुजन कल्याण अधिकारी (गट-ब)

२. वेतनस्तर एस-१५, रु.४१,८००-१,३२,३००

३. दि.०१ जानेवारी, २०२५ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | नांव | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवा/ पदोन्नती) | जन्मतारीख | प्रवर्ग | प्रत्यक्ष रुजु दिनांक/ पदोन्नती दिनांक | ज्येष्ठता दिनांक /ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्ती दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री. अमित मुरलीधर घवले | सरळसेवा १९/१२ | १४.०८.१९८३ | इ.मा.व | २२.०८.२०१४ | २२.८.२०१४ | ३१.०८.२०४१ | बी.एस.सी. एम.ए | |
| २ | २ | श्रीम. दिपा प्रल्हादराव हेरोळे | सरळसेवा ३५/१२ | १५.०६.१९८२ | इ.मा.व | ३०.०८.२०१४ | ३०.०८.२०१४ | ३०.०६.२०४० | बी.ए., डी.एड | |
| ३ | ३ | श्री. दिंगबर हाणवंता राजेमोड | पदोन्नती | ०१.०६.१९६७ | भ.ज.ब | १९.१२.१९९१ | २९.१२.२०२१ | ३१.०५.२०२५ | एच.एस.सी, एम.ए. | |
| ४ | ४ | श्री. बापु सोपानराव दासरी | पदोन्नती | २३.०८.१९६६ | इ.मा.व | १०.०७.१९८५ | ३०.१२.२०२१ | ३१.०८.२०२४ | एल.एल.बी | दि.३१.०८.२०२४ रोजी शासकीय सेवेतुन नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त. |
| ४ | ४ | श्री. दत्तात्रय रंगनाथराव वाघ | पदोन्नती | २९.१२.१९८२ | खुला | १९.०३.२००८ | ३०.१२.२०२१ | ३१.१२.२०४० | एम.एस्सी | |
| ५ | ५ | श्री. राजेंद्र बाबुराव बुजाडे | पदोन्नती | २२.०८.१९६७ | इ.मा.व | १३.१२.१९९३ | १८.०४.२०२२ | ३१.०८.२०२५ | बी.ए. | |

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.04.23 15:18:14 +05'30'

(कैलास साळुंके)
उप सचिव, महाराष्ट्र शासन